विभागामार्फत होणारी धान/भरडधान्य खरेदी, धान भरडाई, जमा होत असलेला सीएमआर, उचल (भारतीय अन्न महामंडळाकडून व सीएमआर उचल) व सीएमआर/भरडधान्य वाटप यासंदर्भातील माहितीमध्ये समन्वय राहण्याकरिता समन्वय कक्ष (Co-ordination Cell) गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१०२/(ई-६२१३३२)/नापु-२९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई.
दि. २४ मे, २०२३.

**प्रस्तावना :-**

किमान आधारभूत किंमत खरेदी योजना ही केंद्र शासनाची योजना असून ती शेतकऱ्यांच्या हितासाठी आहे. या योजनेअंतर्गत केंद्र शासन निरनिराळ्या पिकांच्या किमान आधारभूत किंमती जाहीर करते व आधारभूत किंमतीचा लाभ होण्याच्या दृष्टीने शेतकऱ्यांना हमीभाव किंमतीपेक्षा कमी किंमतीने धान्य विकावे लागू नये म्हणून राज्य शासनातर्फे धान्याची (Fair Average Quality धान व भरडधान्य) खरेदी करण्यात येते.

महाराष्ट्र राज्यात केंद्र शासनाची "नोडल एजन्सी" म्हणून भारतीय अन्न महामंडळ काम पहाते तर भारतीय अन्न महामंडळाच्या वतीने राज्यात आधारभूत किंमत खरेदी योजनेची अंमलबजावणी राज्य शासन मार्केटिंग फेडरेशन, मुंबई (बिगर आदिवासी क्षेत्र) व आदिवासी विकास महामंडळ, नाशिक (आदिवासी क्षेत्र) या दोन अभिकर्ता संस्थांमार्फत करते.

धान/भरडधान्य खरेदी, धान भरडाई, जमा होत असलेला सीएमआर, उचल (भारतीय अन्न महामंडळाकडून व सीएमआर उचल) व सीएमआर/भरडधान्य यासंदर्भातील माहिती वेळोवळी केंद्र शासनास सादर करणे बंधनकारक आहे. तथापि, सदर माहितीमध्ये बऱ्याच वेळी तफावत येत असल्याची बाब भारतीय अन्न महामंडळ, क्षेत्रिय कार्यालय, बोरिवली यांच्याकडून शासनाच्या निदर्शनास आणून देण्यात आली आहे. त्यानुषंगाने सदर माहितीमध्ये सुसूत्रता/समन्वय राहण्याकरिता समन्वय कक्ष (Co-ordination Cell) गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विभागामार्फत होणारी धान/भरडधान्य खरेदी, धान भरडाई, जमा होत असलेला सीएमआर, उचल (भारतीय अन्न महामंडळाकडून व सीएमआर उचल) व सीएमआर/भरडधान्य वाटप यासंदर्भातील माहितीमध्ये सुसूत्रता/समन्वय राहण्याकरिता पुढीलप्रमाणे समन्वय कक्ष (Co-ordination Cell) गठीत करण्यात येत आहे.

१) सह सचिव (नापु-२९), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) उप सचिव (नापु-२२), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सहाय्यक महाव्यवस्थापक (खरेदी), भारतीय अन्न महामंडळ, क्षेत्रीय कार्यालय, बोरिवली.
४) सरव्यवस्थापक (अन्नधान्य), दि.महाराष्ट्र को-ऑप मार्केटींग फेडरेशन, मुंबई.
५) महाव्यवस्थापक, (विपणन), महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक.
६) सर्व उपायुक्त (पुरवठा), विभागीय कार्यालय.
७) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.

२. सदर कक्षाने दर १५ दिवसांनी VC द्वारे (प्रत्येक महिन्याच्या दुसऱ्या व चौथ्या मंगळवारी) धान/भरडधान्य खरेदी, धान भरडाई, जमा होत असलेला सीएमआर, उचल (भारतीय अन्न महामंडळाकडून व सीएमआर उचल) व सीएमआर/भरडधान्य वितरण याबाबतचा आढावा घ्यावा.

३. याप्रकरणी दोन्ही अभिकर्ता संस्था आणि उपायुक्त (पुरवठा) हे सोबतच्या विवरणपत्रातील (विवरणपत्र १ ते ४) माहिती भरून बैठकीदरम्यान सादर करतील. आढाव्याअंती प्राप्त माहितीबाबत खात्री झाल्यानंतर ती माहिती NeML यांच्याकडे पाठविण्यात यावी व नंतर NeML मार्फत केंद्र शासनाच्या CFPP पोर्टलवर अपलोड करण्यात यावी.

४. वरील शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर असून त्याचा संकेतांक २०२३०५२४१३३९४१२८०६ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATISH SHRIDHAR SUPE

Digitally signed by SATISH SHRIDHAR SUPE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE91C22A99ADBAFEB91E1127B17CEF54D9C48672DC90AC9562BA7F619961CBBB, cn=SATISH SHRIDHAR SUPE
Date: 2023.05.24 13:41:20 +05'30'

**(सतीश सुपे)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत :-**

१) सचिव (अनापु व ग्रासंवि), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,कनमुर हाऊस,मुंबई.
३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या.,नाशिक.
४) जिल्हाधिकारी, सर्व.
५) महाव्यवस्थापक, भारतीय अन्न महामंडळ, क्षेत्रीय कार्यालय, बोरिवली.
६) सहाय्यक महाव्यवस्थापक, (खरेदी) भारतीय अन्न महामंडळ, क्षेत्रीय कार्यालय, बोरिवली.
७) सह सचिव (नापु-२९), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) उप सचिव (नापु-२२), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा मुंबई.
१०) उपआयुक्त (पुरवठा), सर्व विभाग.
११) सरव्यवस्थापक (अन्नधान्य), दि.महाराष्ट्र को-ऑप मार्केटींग फेडरेशन, मुंबई.

१२) महाव्यवस्थापक, (विपणन), महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक.

१३) जिल्हा पुरवठा अधिकारी, सर्व.

१४) NeML प्रतिनिधी, मुंबई.

१५) अवर सचिव/कक्ष अधिकारी (नापु-२२), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय.

१६) निवडनस्ती (नापु-२९).

शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१०२/(ई-६२१३३२)/नापु-२९ सोबतचे

विवरणपत्र - १

धान खरेदी (हंगाम ------)

| जिल्हा | खरेदी केंद्र संख्या | शेतकरी नोंदणी | खरेदी केलेली शेतकरी संख्या | झालेली खरेदी (क्विं) | खरेदी केलेल्या धानाची रक्कम (कोटी रू.) | चुकारे अदा केलेली शेतकरी संख्या | अदा केलेली एकूण रक्कम (कोटी रू.) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | |
| | | | | | | | |

भरडधान्य खरेदी (हंगाम ------) (पिकाचे नाव ज्वारी/बाजरी/मका/रागी)

| जिल्हा | खरेदी केंद्र संख्या | शेतकरी नोंदणी | खरेदी केलेली शेतकरी संख्या | झालेली खरेदी (क्विं) | खरेदी केलेल्या भरडधान्याची रक्कम (कोटी रू.) | चुकारे अदा केलेली शेतकरी संख्या | अदा केलेली एकूण रक्कम (कोटी रू.) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | |
| | | | | | | | |

शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१०२/(ई-६२१३३२)/नापु-२९ सोबतचे

विवरणपत्र - २

धान भरडाई (हंगाम ------)

| जिल्हा | निवड केलेल्या मिलचे नाव | भरडाईकरिता दिलेले धान (क्विं) | अपेक्षित सीएमआर (६७ % प्रमाणे) (क्विं) | भरडाई झालेले धान (क्विं) | मिलर्सने DSO कडे जमा केलेला सीएमआर (क्विं) | भरडाई टक्केवारी | भरडाईविना शिल्लक धान (क्विं) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | |
| | | | | | | | |

## शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१०२/(ई-६२१३३२)/नापु-२९ सोबतचे

## विवरणपत्र - ३

### सीएमआर उचल (हंगाम ------)

(क्विंटल मध्ये)

| जिल्हा | गोदामाचे नाव व पत्ता | शासकीय/खाजगी /CWC/MSWC | साठवणूक क्षमता | जोडलेल्या मिल्सची संख्या | जमा केलेला सीएमआर | दिलेले नियतन | उचल केलेला सीएमआर | शिल्लक सीएमआर |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |

(क्विंटल मध्ये)

| जिल्हा | महिना | तांदळाचे नियतन | | FCI कडून केलेली उचल | | | | DCP मधून केलेली उचल | | | | एकूण उचल | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | AAY | PHH | Fortified Rice | | Non Fortified Rice | | Fortified Rice | | Non Fortified Rice | | Fortified Rice | | Non Fortified Rice | |
| | | | | AAY | PHH | AAY | PHH | AAY | PHH | AAY | PHH | AAY | PHH | AAY | PHH |
| | | | | | | | | | | | | | | | |

### सीएमआर वितरण (हंगाम ------)

(क्विंटल मध्ये)

| जिल्हा | महिना | FCI कडील वाटप | | | | DCP मधील वाटप | | | | एकूण वाटप | | | | लाभार्थी | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | Fortified Rice | | Non Fortified Rice | | Fortified Rice | | Non Fortified Rice | | Fortified Rice | | Non Fortified Rice | | | |
| | | AAY | PHH | AAY | PHH | AAY | PHH | AAY | PHH | AAY | PHH | AAY | PHH | AAY | PHH |
| | | | | | | | | | | | | | | | |

शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१०२/(ई-६२१३३२)/नापु-२९ सोबतचे

विवरणपत्र - ४

भरडधान्य वितरण (हंगाम ------)

(क्विंटल मध्ये)

| जिल्हा | महिना | उपलब्ध भरडधान्याचे प्रमाण | | | | गव्हाचे मासिक नियतन | भरडधान्य वितरणासाठी गव्हाचे कमी केलेले नियतन | वितरण केलेले भरडधान्य | | | | एकूण वाटप | शिल्लक | लाभार्थी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | ज्वारी | बाजरी | मका | रागी | | | ज्वारी | बाजरी | मका | रागी | | | |
| | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | |